**टेकडा उपसा सिंचन योजना ता. सिरोंचा जि. गडचिरोली या उपसा सिंचन योजनेचे सर्वेक्षण, संकल्पन व सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याचे कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्र.संकीर्ण- २०२३/(०३/२३) जसंअ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १२.०७.२०२४

**संदर्भ :** कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे क्र.८९३/ विपाविम / कांता ५(१)/टेकडा उसिंयो/प्रमा/२०२४ दि. ०५.०२.२०२४ चे पत्र व प्रस्ताव.

**प्रस्तावना:**

टेकड़ा उपसा सिंचन योजना, गडचिरोली जिल्हयातील सिरोंचा तालुक्यातील टेकडा गावा जवळ प्राणहिता नदीच्या डाव्या तीरावर तेलंगणा राज्यातर्फे बांधण्यांत आलेल्या मेडीगड्डा बॅरेजच्या पाणी पसाऱ्यातून नदीच्या डाव्या तीरावर नियोजीत आहे.

सदर योजना प्राणहिता (G-९) या उपखोऱ्यात येत असून या उपखोऱ्यात महाराष्ट्र राज्यास गोसीखुर्द व इतर १६ स्थळांच्या खालच्या भागात ११६१.१२ दलघमी पाणी वापराचे हक्क प्रदान करण्यात आलेले आहेत. या पाण्यामधुन १६.९६ दलघमी पाणी वापर असलेली टेकडा उपसा सिंचन योजना प्रस्तावित आहे. सदर योजना शासकीय खर्चाने हाती घेण्याचे दृष्टीने मा. मुख्यमंत्री यांची मान्यता प्राप्त झालेली आहे.

टेकडा उपसा सिंचन योजनेमुळे गडचिरोली जिल्ह्यांतील सिरोंचा तालुक्यातील १४ गावातील २३२८ हेक्टर क्षेत्रास लाभ मिळणार आहे.

त्या अनुषंगाने प्रस्तुत योजनेचे सर्वेक्षण, अन्वेषन करुन सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याच्या कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय निर्गमित करण्यात येत आहे :

**शासन निर्णय :**

प्रस्तावित टेकडा उपसा सिंचन योजना ता. सिरोंचा जि. गडचिरोली योजनेचे सर्वेक्षण, संकल्पन व सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याचे कामास जलसंपदा विभागाच्या सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित एकूण रु. १,९४,३२,०९४/-( रू. एक कोटी चौ-यान्नव लाख बत्तीस हजार चौ-यान्नव फक्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजनेसाठीचा खर्च "४७०१- मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक व इतर क्षेत्रातील गुंतवणुका, (०२) (०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान ५४ गुंतवणुका (४७०१ एच ६६५)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.

सदर शासन निर्णय हा प्रशासकीय विभागास प्राप्त वित्तीय अधिकारात व आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०७१२१७४६३७३७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

JAYA PRAVIN POTDAR

Digitally signed by JAYA PRAVIN POTDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=a6bf66f95dd09d40d69a5737642a79f0e7da9d3150abc54cc7bad607088c7c18, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=45E2D63499928F8B69AB9E8EA3E7CBAB44D2E79B3CF5C253F37180C7E6DE4371, cn=JAYA PRAVIN POTDAR
Date: 2024.07.12 17:57:47 +05'30'

**( जया पोतदार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
मा.उप मुख्यमंत्री, (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
अतिरिक्त मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सचिव (प्रकल्प समन्वय) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर
सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक
आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
विभागीय आयुक्त (अनुदेयता), महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर
जसंअ कार्यासन संग्रहार्थ